नागपूर विभागातील भूसंपादन आस्थापनेवरील अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२२ ते दि. ३१.०८.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पमुवा -२०२२/प्र.क्र.२१/अ-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०७ मार्च, २०२२.

**वाचा :-** १) वित्त विभागाचा शा.नि.क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.२२.०२.२०२२.
२) वि.आ.नागपूर यांचे पत्र क्र.भूसंपादन/कार्या-४(२)/कावि-६३/२०२२, दि.२२.०२.२०२२.

**शासन निर्णय :-**

नागपूर विभागातील भूसंपादन आस्थापनेवरील ९४ अस्थायी पदांना दि. २८.०२.२०२२ पर्यत मंजूरी देण्यात आली होती. नागपूर विभागातील भूसंपादन आस्थापनेवरील ९४ अस्थायी पदांची आवश्यकता असल्याने सदर अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२२ ते दि.२८.०२.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यास विभागीय आयुक्त, नागपूर यांनी संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये विनंती केली आहे.

वित्त विभागाने संदर्भ क्र.१ च्या आदेशानुसार अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२२ ते दि. ३१.०८.२०२२ पर्यंत मुदतवाढीचे अधिकार प्रशासकीय विभागांना दिले आहेत. सदर शासन निर्णयानुसार आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही अशा आस्तित्वात असलेल्या सोबत जोडलेल्या ‘जोडपत्र-अ’ मध्ये नमूद ९४ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२२ ते दि. ३१.०८.२०२२ पर्यंत मुदत वाढीस मंजुरी देण्यात येत आहे.

१) अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या पदांवरील कर्मचा-यांना विभागांतर्गत रिक्त पदावर सामावून घेण्यात आले आहे अथवा वित्त विभागातील अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे वर्ग करण्यात आले आहे.
२) उक्त ९४ अस्थायी पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त नाही व सदर पदांचा अस्थायी पदांच्या आढाव्यामध्ये समावेश आहे.
३) सदर अस्थायी पदांच्या वेतनाचा खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.
४) ही सर्व पदे त्या विभागाच्या स्थायी संवर्गात तात्पुरती म्हणून समजण्यात यावीत .
५) सदर पदे शासनाच्या वेळोवेळी काढण्यात आलेल्या आदेशाप्रमाणे महागाई भत्ता व इतर पूरक भत्ते मिळण्यास पात्र राहतील.

२. याबाबत होणारा खर्च ``मागणी क्र. सी-१/२०२९/जमीन महसूल-००१-संचालन व प्रशासन पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना (०२) भूमी संपादन आस्थापना योजनांतर्गत (०२), (०५) आयुक्त, नागपूर वेतने (२०२९ ०२४२ ०१) आणि योजनेतर पदावरील खर्च, योजनेतर (०१)(०५) आयुक्त, नागपूर - वेतने (योजनेतर) (२०२९ ०१२६ ०१) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून तो खर्च वित्तीय वर्ष २०२१-२०२२ व २०२२-२०२३ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच याबाबतचा प्रत्यक्ष खर्च वर्षअखेर संबंधित संपादन विभागाकडे (महसूल व वन विभागाखेरीज) वर्ग करण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शा. नि. क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२२.०२.२०२२ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२२०३०७१३०३४७३४१९ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nitin Ganesh Sonkhaskar

Digitally signed by Nitin Ganesh Sonkhaskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ad84daad5bc79f6d90c62a987708b24ed191867c04fb6c815de59aff3e614298, serialNumber=29f6a57cdb1152eab3b6f60fa7218f9da9621b43a1094379e9d6d5e49321b789, cn=Nitin Ganesh Sonkhaskar
Date: 2022.03.07 13:07:43 +05'30'

**( नि. ग. सोनखासकर )**
कार्यासन अधिकारी

**सोबत:- जोडपत्र-अ**

**प्रति,**

१) आयुक्त, नागपूर विभाग,नागपूर (२ प्रती)
२) महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा / अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर (२ प्रती)
३) जिल्हाधिकारी, नागपूर /वर्धा/चंद्रपूर/भंडारा/गोंदिया /गडचिरोली.
४) जिल्हा कोषागार अधिकारी,नागपूर /वर्धा/चंद्रपूर/भंडारा/गोंदिया /गडचिरोली.
५) जलसंपदा विभाग, कार्यासन टि-४/टि-१२/टि-१९,मोप्र-२,अर्थ-१ व बी शाखा, मंत्रालय, मुंबई-३२.
६) सार्वजनिक बांधकाम विभाग ,मंत्रालय ,मुंबई-३२.
७) नगर विकास विभाग ,मंत्रालय ,मुंबई-३२.
८) अर्थ-९, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
९) अवर सचिव / कार्यासन अधिकारी ,अ-२/अ-३/अ-४/ ई-१/ई-६/ई-७/ई-८/भ-१,र-१२ कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) निवडनस्ती/अ-१, मंत्रालय, मुंबई-३२.

## जोडपत्र –अ

➢ **शासन निर्णय** :-

महसूल व वन विभाग क्रमांक पमुवा -२०२२/प्र.क्र. २१/अ-१, दि. ०७ मार्च ,२०२२.

नागपूर विभागातील भूसंपादन आस्थापनेवरील मुदत वाढ द्यावयाच्या ९४ अस्थायी पदांबाबतचे विवरणपत्र:-

| अ.क्र. | जिल्हा | मुदतवाढीसाठी नागपूर विभागातील अस्थायी पदांचा तपशील | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | उपजिल्हाधिकारी | अव्वल कारकून | मंडल अधिकारी | कनिष्ठ लिपिक | वाहन चालक | शिपाई | एकूण |
| **०१** | **नागपूर** | ०७ | ०६ | ०५ | ०७ | ०० | १२ | ३७ |
| **०२** | **वर्धा** | ०४ | ०३ | ०३ | ०३ | ०१ | ०८ | २२ |
| **०३** | **भंडारा** | ०४ | ०४ | ०४ | ०४ | ०० | ०८ | २४ |
| **०४** | **चंद्रपूर** | ०१ | ०० | ०० | ०० | ०० | ०० | ०१ |
| **०५** | **गोंदिया** | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०० | ०२ | ०६ |
| | **एकूण-अ** | १७ | १४ | १३ | १५ | ०१ | ३० | ९० |
| **०६** | **विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर**<br>**नगर रचनाकार- ०१**<br>**अव्वल कारकून-०२**<br>**लघु टंकलेखक-०१**<br>**एकूण-ब= ०४** | | | | | | | ०४ |
| | **एकूण ( अ+ब )** | | | | | | | ९४ |

************